**मौ.मांजरम ता.नायगाव (खै.) जि.नांदेड येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१८/प्र.क्र.२४३/पापु १८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २० ऑक्टोबर, २०१८

वाचा -

**१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांचे पत्र जा.क्र./जि.प.ना./पा.पु.विभाग नांदेड/तांशा-८५५/२०१८, दि.२७/०३/२०१८.**
**२) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-७ दि. ९/१०/२०१३.**
**३) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ)/पापु-७, दि.१७/०३/२०१०.**
**४) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११३/प्र.क्र.१५६/पापु-७, दि. २२ जानेवारी, २०१४.**
**५) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/पापु-७, दि.९/७/२०१४.**
**६) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११४/प्र.क्र.५२/पापु-७/, दि.१७/१०/२०१४.**
**७) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११५/प्र.क्र.२२/पापु-७/दि.१६/०२/२०१५.**
**८) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो ११११/प्र.क्र.१३४/पापु-७,दि.२०/०२/२०१५.**
**९) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो १११४/प्र.क्र.६१/पापु-७, दि. १५ /६/२०१५.**

प्रस्तावना -

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत मौजे.मांजरम ता. नायगाव (खै), जि. नांदेड येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.१ येथील पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. सदर योजनेच्या ५९४.६२ लाख किंमतीच्या अंदाजपत्रकास अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नांदेड यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

मौजे.मांजरम ता. नायगाव (खै), जि. नांदेड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३६१९ एवढ्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. ६,१७,२८,२८६./-(ढोबळ) (अक्षरी रुपये सहा कोटी सतरा लक्ष अठ्ठावीस हजार दोनशे शहाऐंशी फक्त) एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नांदेड यांनी करावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्षे योजनेची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी कंत्राटदारावर बंधनकारक राहील.
२) योजनेतील उर्वरित किंमतीना तांत्रिक मान्यता देण्यात यावी.
३) योजनेची उद्धरण नलिका ही वन विभागातून जात असल्याने वन विभागाची परवानगी प्राप्त करून घेण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील
४) योजनेची कामे विहीत पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.
५) योजनेसाठी आवश्यक भूसंपादन व इतर सर्व परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेस कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत.
६) योजनेची कामे मंजुर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या टप्या-टप्याने पूर्ण करण्यात यावीत.
७) योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.
८) योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी सविस्तर प्रकल्प अहवालात दर्शविलेला खर्चाचा तपशिल दुरुस्त करुन सदर खर्च किमान ठेवावा. तसेच सदर खर्च भागविण्याकरिता व योजना आर्थिदृष्टया स्वयंपूर्ण होण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने घरगुती नळ धारकासाठी किमान पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी. या सर्व बाबी संबंधित ग्रमापंचायतीस देणे अंमलबजावणी यंत्रणेच्या अधिका-यांची राहील.
९) योजना चालविणे, त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.
१०) अस्तित्वातील स्तोत्रांचे बळकटीकरण करण्यात यावे.
११) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.
१२) शासनाच्या प्रचलित तरतुदीनुसार हागणदारी मुक्तीसंदर्भात कार्यवाही करण्यात यावे.
१३) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच शासनाच्या प्रचलित धोरणानुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे अनिवार्य राहील.
१४) योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिका-याकडे सादर करणे बंधनकारक राहील.
१५) योजनेच्या अंमलबजावणी मध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.
१६) योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखल संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त करून घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), यांची राहील.
१७) योजना प्रचलित शासन धोरणानुसार राबविण्यात येत आहे याची दक्षता घ्यावी.

१८) ग्रामपंचायतीकडे वीजबील थकबाकी असल्यास ती पुर्ण भरल्याशिवाय कार्यादेश देण्यात येऊ नये.

१९) पुर्वीच्या योजनेचे लेखे आर्थिकदृष्टया पूर्ण केले आहेत किंवा कसे ही बाब तपासणे संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील. लेखे पुर्ण करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२०१६४९१४२६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: CN = Suresh Sawairam Rathod, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.10.20 17:26:04 +05'30'

**( सु.स.राठोड )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
३. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद.
४. मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
७. महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८. महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद
११. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नांदेड
१२. संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद
१४. वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद
१५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड.
१६. अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१८. प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९. मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२०.कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय, मुंबई-३२
२१. निवड नस्ती कार्यासन पापु-१८.